अनुसचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या अथवा अन्य जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या महसूली क्षेत्रीय आस्थापनेवरील नायब तहसिलदार यांच्याकरीता निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- ईएसटी-२०२२/प्र.क्र.१६९/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११ फेब्रुवारी, २०२५.

**संदर्भ:-**

१. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१/१२/२०१९.
२. सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय,क्र.बीसीसी-२०२०/प्र.क्र.१८७अे/१६-ब, दि.३०/०६/२०२०
३. महसूल व वन विभाग,शासन निर्णय,क्र.इएसटी-२०२२/प्र.क्र.०३/ई-८, दि.०१/०६/२०२०.
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय,क्र.इएसटी-२०२२/प्र.क्र.१६९/ई-८, दि.२७/०२/२०२३.
५. सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय,क्र.बीसीसी-२०१९/प्र.क्र.५८१अे/१६-ब, दि.१४/१२/२०२२.
६. महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.इएसटी-२०२२/प्र.क्र.१६९/ई-८, दि.२७/०२/२०२३.
७. सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णयक्र.बीसीसी-११२३/प्र.क्र.२९/सुधारणा-२, दि.४/१०/२०२४.
८. सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक क्र.बीसीसी-११२४/प्र.क्र.४५/आरक्षण-२(१६-ब) दि.०७/०५/२०२४.
९. महसूल व वन विभाग, कार्यासन ई-९ ची दि.०९/०१/२०२५ रोजीची टिप्पणी.

**प्रस्तावना:-**

मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपिल क्र. ८९२८/२०१५ व इतर याचिका यामध्ये दिनांक ०६/०७/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध

ठरलेल्या कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदावर वर्ग करण्याची कार्यवाही सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.०१ येथील शासन निर्णयास अनुसरुन संदर्भ क्रमांक ०३ येथील शासन निर्णयान्वये, महसूल विभागातील नायब तहसिलदार गट-ब संवर्गातील १७ अधिकाऱ्याच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्यात आल्या आहेत.

उपरोक्त संदर्भ क्र.०२ येथील शासन निर्णयान्वये, अधिसंख्य पद निर्माण करण्याचे अधिकार संबंधित प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आले आहेत. तसेच, सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १४/१२/२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये अधिसंख्य पदावरील कर्मचाऱ्यांना सेवाविषयक तसेच सेवानिवृत्तीचे लाभ देण्याबाबत निर्णय घेण्यात आलेला आहे. त्यानुषंगाने पुणे, छत्रपती संभाजीनगर, कोकण महसूली विभागाच्या अधिनस्त असलेल्या आस्थापनेवरील अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्ती मिळालेल्या तथापि, सदर प्रवर्गाची जात वैधता सादर करु न शकणाऱ्या अधिकारी/कर्मचाऱ्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदांना संदर्भाधिन शासन निर्णय, दि.०१/०६/२०२० व दि.२७/०२/२०२३ अन्वये ११ महिन्यांच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली होती. सदर अधिसंख्य पदांची मुदत संपुष्टात आल्यामुळे त्या अधिसंख्य पदांना मुदत वाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महसूल व वन विभाग, शासन निर्णय,दिनांक ०१/०६/२०२० दिनांक २७/०२/२०२३ च्या शासन निर्णयान्वये अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात आलेल्या नायब तहसिलदारांची मुदत दिनांक ३१.०८.२०२३ रोजी संपुष्टात आली असल्याने सदर नियुक्त्यांना दिनांक ०१.०९.२०२३ ते दिनांक ३१.०७.२०२४ पर्यंत पूर्वलक्षी प्रभावाने मुदतवाढ देण्यात येत आहे. तसेच दिनांक ०१/०८/२०२४ पासून पुढील ११ महिने किंवा ते सेवेत राहीले असता, ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे अगोदर घडेल ते, तोपर्यंत या शासन निर्णयान्वये अधिसंख्य पदावरील नियुक्तीस मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकारी / कर्मचारी यांचे नाव | निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदांचे पदनाम | शासन सेवेतील प्रथम नियुक्तीचा दिनांक | सेवा निवृत्तीचा दिनांक | यापूर्वी ११ महिन्यासाठी दिलेली नियुक्ती संपुष्टात येण्याचा दिनांक | नियुक्ती पुढील ११ महिन्यासाठी खालील कालावधीसाठी मुदतवाढ |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्रीमती लता कोळी (पाटील) | नायब तहसिलदार | ०८.०८.१९९० | ३१.०७.२०२६ | ३१.०८.२०२३ | ०१.०९.२०२३ ते ३१.०७.२०२४ (पूर्वलक्षी प्रभावाने) |
| | | | | | | ०१.०८.२०२४ ते ३०.०६.२०२५ |
| २ | श्री.एस.एच.दिवकर | नायब तहसिलदार | ११.१२.१९९१ | ३१.१०.२०२४ | ३१.०८.२०२३ | ०१.०९.२०२३ ते ३१.०७.२०२४ (पूर्वलक्षी प्रभावाने) |
| | | | | | | ०१.०८.२०२४ ते ३१.१०.२०२४ (से.नि.दिनांकापर्यत) |
| ३ | श्री.एस.एल.पाटील | नायब तहसिलदार | ११.११.१९८५ | ३०.०६.२०२४ | ३१.०८.२०२३ | ०१.०९.२०२३ ते ३०.०६.२०२४ (से.नि.दिनांकापर्यत) |
| ४ | श्री.मनोहर मष्णाजी तांबोळी | नायब तहसिलदार | ३०.११.१९८९ | ३०.०६.२०२५ | ३१.०८.२०२३ | ०१.०९.२०२३ ते ३१.०७.२०२४ (पूर्वलक्षी प्रभावाने) |
| | | | | | | ०१.०८.२०२४ ते १०.०९.२०२४ (स्वेच्छा सेवानिवृत्ती दिनांकापर्यंत) |
| ५ | श्री.विलास विठ्ठल तेलंग | नायब तहसिलदार | २१.०२.१९९२ | ३१.०३.२०३१ | ३१.०८.२०२३ | ०१.०९.२०२३ ते ३१.०७.२०२४ (पूर्वलक्षी प्रभावाने) |
| | | | | | | ०१.०८.२०२४ ते ३०.०६.२०२५ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ६ | श्रीम.शोभा कोळी | नायब तहसिलदार | ०३.०४.१९८४ | ३०.०९.२०२३ | ३१.०८.२०२३ | ०१.०९.२०२३<br>ते<br>३०.०९.२०२३<br>(से.नि.दिनांकापर्यत) |
| ७ | श्री.बी.सी.कोळी | नायब तहसिलदार | ०२.०१.१९९५ | ३०.०६.२०३१ | ३१.०८.२०२३ | ०१.०९.२०२३<br>ते<br>०३.१०.२०२३<br>( पूर्वलक्षी प्रभावाने )<br>( दि.३.१०.२०२३ रोजी स्वेच्छा सेवानिवृत्त ) |
| ८ | श्री.पी.के.कोळी | नायब तहसिलदार | ०३.०१.१९९५ | ३१.०३.२०२६ | ३१.०८.२०२३ | ०१.०९.२०२३<br>ते<br>३१.०७.२०२४<br>( पूर्वलक्षी प्रभावाने ) |
| | | | | | | ०१.०८.२०२४<br>ते<br>३०.०६.२०२५ |
| ९ | श्री.उमेश कोळी | नायब तहसिलदार | २५.०१.१९९० | ३०.०६.२०२७ | ३१.०८.२०२३ | ०१.०९.२०२३<br>ते<br>३१.०७.२०२४<br>( पूर्वलक्षी प्रभावाने ) |
| | | | | | | ०१.०८.२०२४<br>ते<br>३०.०६.२०२५ |

२. सदर अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणारे अधिकाऱ्यांपैकी सेवेत कार्यरत अधिकारी, सध्या ज्या पदावर कार्यरत आहेत त्या पदाकरिता निर्माण करण्यात आलेले अधिसंख्य पद तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरिता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत, यापैकी जे आधी घडेल त्या दिनांकापर्यंत सदर अधिसंख्य पदे अस्तित्वात राहील.

३. सदर अधिसंख्य पदावरील मुदतवाढीस सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१४/१२/२०२२ अन्वये देण्यात आलेला तांत्रिक खंड सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय, दिनांक ०४/१०/२०२४ मधील तरतुदीनुसार सर्व सेवाविषयक (पदोन्नती व अनुकंपा धोरण वगळून) व सेवानिवृत्ती विषयक लाभांसाठी क्षमापित करण्यात येत आहे.

४. सदर अधिसंख्य पदांच्या वेतनावर येणारा खर्च हा संबंधित अधिकारी सध्या ज्या महसूली विभागात कार्यरत आहेत त्या विभागाच्या वेतनासंबंधीच्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. यासंदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन दि.२१/१२/२०१९, दि.३०/०६/२०२० व दि.०४/१०/२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील नमूद सूचनानुसार आवश्यक ती कार्यवाही करण्याची जबाबदारी संबंधित विभागीय आयुक्त कार्यालयाची यांची राहील.

६. सदर शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २१/१२/२०१९, दिनांक ३०/०६/२०२० व दिनांक ०४/१०/२०२४ या शासन निर्णयातील तरतूदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०२१११६१५४०६८१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

SATYANARAYAN
SHIVPRASAD BAJAJ

Digitally signed by SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=559498df564ab1121a356349085c1b8e3cc0f12569ba0f7f2090386d4dccb333, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F7145AF5949FB706E2DCB06C2B209B58FFA369F6E085E02041722C90F0528791, cn=SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
Date: 2025.02.11 16:17:01 +05'30'

**( सत्यनारायण बजाज )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. अ.मु.स. ( महसूल ) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय,मुंबई-३२
४. विभागीय आयुक्त, (सर्व )
५. जिल्हाधिकारी (सर्व )
६. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर.
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व )
१०. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई - ३२.
११. सामान्य प्रशासन विभाग, ( कार्यासन-१६-ब), मंत्रालय, मुंबई - ३२.
१२. महसूल व वन विभाग, कार्यासन ई-१/ई-२/ई-३/ई-९, मंत्रालय,मुंबई - ३२.
१३. निवड नस्ती (ई-८)